महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत प्रदान करण्यात येणाऱ्या पुरस्कार/ पारितोषिकांसाठी पात्र व्यक्तींच्या नावांची शिफारस करण्यासाठी "शोध व निवड समिती" गठीत करण्याबाबत....

## महाराष्ट्र शासन

### अल्पसंख्याक विकास विभाग

### शासन निर्णय क्रमांक : उसाअ २०१६/प्र.क्र.१५/१७/उसाअ/का-४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १६ मे, २०१७

वाचा :

शासन निर्णय : अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. उसाअ-२०१६/प्र.क्र.०६(सुधा-१)/का-४, दि.०५.१०.२०१६

प्रस्तावना-

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई मार्फत प्रदान केल्या जाणाऱ्या पुरस्कारांसाठी पात्र व्यक्तींच्या नावांची शिफारस करण्यासाठी, उपरोल्लेखित शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२.१२.१ मधील तरतुदींनुसार "शोध व निवड" समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय-

महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत प्रदान केल्या जाणाऱ्या पुरस्कारांसाठी पात्र व्यक्तींच्या नांवाची शिफारस करण्यासाठी पुढे नमुद केल्याप्रमाणे "शोध व निवड" समिती गठीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

| अ.क्र. | नांव व हुद्दा | पदनाम |
|---|---|---|
| १. | प्रो. मोहम्मद गयासुद्दिन, उर्दु विभाग प्रमुख, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापिठ, औरंगाबाद | अध्यक्ष |
| २. | प्रो.साहेब अली, उर्दु विभाग प्रमुख, मुंबई विद्यापिठ | सदस्य |
| ३. | डॉ. प्रमोद शर्मा, प्रभारी उर्दु विभाग प्रमुख, नागपूर विद्यापिठ | सदस्य |
| ४. | डॉ. महोम्मद शर्फूद्दिन साहील, नागपूर (उर्दु लेखक/कवी) | सदस्य |
| ५. | डॉ. श्रीमती शाईस्ता अख्तर खान, मुंबई (उर्दु लेखक) | सदस्य |
| ६. | नक्शबंदी सय्यद नुरुल हसनेन, औरंगाबाद (उर्दु लेखक) | सदस्य |
| ७. | श्री. मजीद शोला (छोटे), नागपूर (अशासकीय सदस्य, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई) | सदस्य |
| ८. | श्रीमती एजाज फातेमा पाटणकर, मुंबई (अशासकीय सदस्य, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई) | सदस्य |
| ९. | श्री.सं.छ.तडवी, सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| १० | अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई | सचिव |

२. उपरोक्त समितीने उपरोल्लेखित दि.०५.१०.२०१६ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.२.१२.१ मधील मुद्दा क्र.१०, ११, १२ व १३ अन्वये देण्यात आलेल्या निदेशांचे काटेकोरपणे पालन करावे व त्यानुसार महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमीमार्फत सन २०१५ व २०१६ या वर्षी दिल्या जाणाऱ्या पुरस्कारांसाठी पात्र व्यक्तींच्या नांवासंदर्भातील आपल्या शिफारशी शासनास सादर कराव्यात.

३. यावर होणारा खर्च महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबईला या उद्दिष्टासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली खर्ची टाकावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१६१२१००६५६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Farooq Ahmed Noorkhan Pathan

Digitally signed by Farooq Ahmed Noorkhan Pathan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Farooq Ahmed Noorkhan Pathan
Date: 2017.05.16 12:48:48 +05'30'

**( फारुख नू. पठाण )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण,मंत्रालय, मुंबई,
४) प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
५) कुलसचिव, मुंबई/नागपूर/औरंगाबाद विद्यापिठ,
६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी) ,
७) खाजगी सचिव, मा. मंत्री, अल्पसंख्याक विकास, मंत्रालय, मुंबई,
८) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री, अल्पसंख्याक विकास , मंत्रालय, मुंबई,
९) सह सचिव/उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई,
११) उपरोक्त समितीचे अध्यक्ष व सर्व सदस्य,
१२) निवडनस्ती (कार्यासन-४),
१३) कार्यासन-४, संग्रहार्थ.